हाताने मैला उचलणा-या सफाई कामगारांच्या नियुक्तीस प्रतिबंध करणे व त्यांचे पुनर्वसन अधिनियम, २०१३ च्या अंमलबजावणीसंदर्भात मा.सर्वोच्च न्यायालयाने रिट याचिका क्र. ३२४/२०२० (डॉ.बलराम सिंग विरुध्द भारत सरकार) प्रकरणी दिलेल्या न्याय निर्णयास अनुसरुन दूषित गटारामध्ये काम करताना मृत्यू पावलेल्या /कायम अपंगत्व/ अपंगत्व आलेल्या मॅन्युअल स्कॅव्हेंजर्सना / सफाई कामगारांना नुकसान भरपाई अदा करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्र. हामैऊ-२०२४/प्र.क्र. ५१/सआक**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ३० एप्रिल, २०२५.

**वाचा :**

१. हाताने मैला उचलणा-या सफाई कामगारांच्या नियुक्तीस प्रतिबंध करणे व त्यांचे पुनर्वसन करणे अधिनियम २०१३,
२. रिट याचिका (सिव्हील) क्रमांक- ५८३/२००३ मध्ये मा.सर्वोच्च न्यायालयाने दिनांक २७/३/२०१४ रोजी दिलेले आदेश.
३. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन परिपत्रक क्रमांक-सफाई २०१३/प्र.क्र.२११ (भाग-२)/ महामंडळे, दि.१६/१०/२०१४,
४. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक-हामैऊ २०१५/ प्र.क्र.१९६/ अजाक-१, दि.७/८/२०१५,
५. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक-हामैऊ २०१८/प्र.क्र.१०७/अजाक, दि.११/६/२०१९,
६. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन अधिसूचना क्रमांक-हामैऊ २०१८/प्र.क्र.३८२ (भाग१)/अजाक, दि.३१/७/२०१९,
७. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन अधिसूचना क्रमांक-हामैऊ २०१८/प्र.क्र.३८२ (भाग२)/अजाक, दि.३१/७/२०१९,
८. गृह विभाग, शासन अधिसूचना क्रमांक-पीआरओ ०८१९/प्र.क्र.३०२/विशा-२, दिनांक २०/९/२०१९,
९. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक-हामैऊ-२०१९/प्र.क्र. २६८/ अजाक, दिनांक १२/१२/२०१९,
१०. रिट याचिका क्र.३२४/२०२० प्रकरणी मा.सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली यांचे दिनांक २०/१०/२०२३ रोजीचे आदेश.

**प्रस्तावना:-**

केंद्र शासनाने हाताने मैला उचलणाऱ्या सफाई कामगारांच्या नियुक्तीस प्रतिबंध घालणे व त्यांचे पुनर्वसन करणे, अधिनियम, २०१३ व त्याअंतर्गत केलेल्या नियमांची अंमलबजावणी करण्यासंदर्भात मा. सर्वोच्च न्यायालयाने रिट पिटीशन क्र. ५८३/२००३ मध्ये दिनांक २७/०३/२०१४ रोजी दिलेल्या न्याय

निर्णयानुसार सन १९९३ पासून सफाई कामगार / मॅन्युअल स्कॅव्हेंजर्सचे काम करताना दूषित गटारामध्ये (मुख्यत: मलनि:सारण कुंड/खड्डे, भूमिगत गटारे, मलनि:सारण वाहिन्यांमध्ये) मृत्यू पावलेल्या कामगारांच्या कुटुंबांचा शोध घेऊन अशा मृत्यू पावलेल्या कामगारावर अवलंबून असणाऱ्या कुटुंबातील सदस्यांना रु. १० लाख नुकसान भरपाई देण्याचा तसेच त्या अनुषंगाने नुकसान भरपाई देण्यासाठी सक्षम प्राधिकारी (जबाबदार अधिकारी) निश्चित करण्यास या विभागाच्या संदर्भ क्र. ९ येथील दिनांक १२.१२.२०१९ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. तथापि, प्रस्तुत प्रकरणी मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल रिट याचिका क्र.३२४/२०२० (डॉ.बलराम सिंग विरुध्द भारत सरकार) प्रकरणी मा.सर्वोच्च न्यायालयाने दिनांक २०.१०.२०२३ च्या आदेशातील परिच्छेद क्र. ९६ अन्वये खालीलप्रमाणे आदेश दिले आहेत.

Directions -Para. 96

(4) The court hereby directs the Union and the States to ensure that the compensation for sewer deaths is increased (given that the previous amount fixed, i.e., Rs. 10 lakhs) was made applicable from 1993. The current equivalent of that amount is Rs. 30 lakhs. This shall be the amount to be paid, by the concerned agency, i.e., the Union, the Union Territory or the State as the case may be. In other words, compensation for sewer deaths shall be Rs. 30 lakhs. In the event, dependents of any victim have not been paid such amount, the above amount shall be payable to them. Furthermore, this shall be the amount to be hereafter paid, as compensation.

(5) Likewise, in the case of sewer victims suffering disabilities, depending upon the severity of disabilities, compensation shall be disbursed. However, the minimum compensation shall not be less than Rs. 10 lakhs. If the disability is permanent, and renders the victim economically helpless, the compensation shall not be less than Rs. 20 lakhs.

मा.सर्वोच्च न्यायालयाचे उपरोक्त आदेश विचारात घेता हाताने मैला उचलणा-या सफाई कामगारांच्या नियुक्तीस प्रतिबंध करणे व त्यांचे पुनर्वसन अधिनियम, २०१३ च्या अंमलबजावणीसंदर्भात दूषित गटारामध्ये काम करताना मृत्यू पावलेल्या /कायम अपंगत्व /अपंगत्व आलेल्या मॅन्युअल स्कॅव्हेंजर्सना / सफाई कामगारांना / कुटुंबाना नुकसान भरपाई अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

मा.सर्वोच्च न्यायालयाने रिट पिटीशन क्र. ३२४/२०२० (डॉ.बलराम सिंग विरुध्द भारत सरकार) प्रकरणी दिनांक २०.१०.२०२३ रोजी दिलेल्या न्यायनिर्णयानुसार सफाई कामगार/ मॅन्युअल स्कॅव्हेंजर्सचे काम करतांना दूषित गटारामध्ये (मुख्यत: मलनि:सारण कुंड/खड्डे, भूमिगत गटारे, मलनि:सारण वाहिन्यांमध्ये) मृत्यू पावलेल्या कामगारांच्या कुटूंबांचा शोध घेऊन अशा मृत्यू पावलेल्या कामगारावर अवलंबून असणाऱ्या कुटूंबातील सदस्यांना रु. ३० लाख तसेच कामाच्या दरम्यान आलेल्या अपंगत्वाच्या गंभीरतेनुसार संबंधित सफाई कामगारास / मॅन्यूअल स्कॅव्हेंजर्सना कायमच्या अपंगत्वासाठी रू.२० लाख व अपंगत्वासाठी रू.१० लाख इतकी नुकसान भरपाई देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर नुकसान भरपाई अदा करण्यासाठी सक्षम प्राधिकारी (जबाबदार अधिकारी) खालीलप्रमाणे असतील.

| **अ. क्र.** | **ज्या क्षेत्रात/ अधिनस्त दूषित गटारामध्ये सफाई कामगाराचा/ मॅन्युअल स्कॅव्हेंजर्सचा मृत्यू झाला / कायमचे अपंगत्व / अपंगत्व आले ते क्षेत्र/ आस्थापना/ कार्यालय** | **दूषित गटारामध्ये मृत्यू पावलेल्या /कायम अपंगत्व / अपंगत्व आलेल्या सफाई कामगाराचा /मॅन्युअल स्कॅव्हेंजर्सचा प्रवर्ग** | **नुकसान भरपाई देणारा सक्षम प्राधिकारी (जबाबदार अधिकारी)** |
|---|---|---|---|
| १ | महानगरपालिका | नियमित/कंत्राटी/ रोजंदारी/ बाह्यस्त्रोता-द्वारे नियुक्त महानगरपालिका सफाई कामगार आणि महानगरपालिकेने खाजगी कंत्राटदाराकडील तसेच बाह्यस्त्रोत कंत्राटाद्वारे त्यांच्या कामासाठी नियुक्त केलेले सफाई कामगार | आयुक्त, महानगरपालिका (महानगरपालिकेने त्यांच्या निधीतून ) |
| २ | नगरपरिषद/ नगरपालिका/ नगरपंचायत | नियमित/कंत्राटी/ रोजंदारी/ बाह्यस्त्रोता-द्वारे नियुक्त नगरपरिषद/ नगरपालिका/ नगरपंचायत सफाई कामगार आणि नगरपरिषद/ नगरपालिका/ नगरपंचायत यांनी खाजगी कंत्राटदाराकडील तसेच बाह्यस्त्रोत कंत्राटाद्वारे त्यांच्या कामासाठी नियुक्त केलेले सफाई कामगार | मुख्याधिकारी, नगर परिषद/ नगरपालिका / नगरपंचायत (नगरपरिषद/ नगरपालिका/ नगरपंचायत यांनी त्यांच्या निधीतून) |
| ३ | जिल्हा परिषद/ पंचायत समिती/ग्रामपंचायत | नियमित/कंत्राटी/ रोजंदारी/ बाह्यस्त्रोता-द्वारे नियुक्त जिल्हा परिषद/ पंचायत समिती/ ग्रामपंचायत सफाई कामगार आणि जिल्हा परिषद/ पंचायत समिती/ ग्रामपंचायत यांचेकडून खाजगी कंत्राटदाराकडील तसेच बाह्यस्त्रोत कंत्राटाद्वारे त्यांच्या कामासाठी नियुक्त केलेले सफाई कामगार | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (जिल्हा परिषदेच्या निधीतून) |
| ४ | राज्य शासनाचे कार्यालय/ आस्थापना | नियमित/कंत्राटी/रोजंदारी/ बाह्यस्त्रोता-द्वारे राज्य शासनाचे कार्यालय/ आस्थापना येथे नियुक्त सफाई कामगार आणि सदर कार्यालय/ आस्थापना यांनी खाजगी कंत्राटदाराकडील तसेच बाह्यस्त्रोत कंत्राटाद्वारे त्यांच्या कामासाठी नियुक्त केलेले सफाई कामगार | संबंधित कार्यालय/आस्थापना यांचे प्रशासकीय प्रमुख (कार्यालये/ आस्थापना |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | यांचेकडील निधीतून) |
| ५ | महाराष्ट्र शासनाचा उपक्रम असलेल्या संस्था (Parastatal Organisations/State owned Entity) उदा. म्हाडा, सिडको, एमएमआरडीए, एनएमआरडीए, पीएमआरडीए, पीसीएनडीटी इत्यादी | नियमित/कंत्राटी/ रोजंदारी/ बाह्यस्त्रोता-द्वारे महाराष्ट्र शासनाचा उपक्रम असलेल्या संस्थांमधील (Parastatal Organisations/State owned Entity) उदा. म्हाडा,सिडको, एमएमआरडीए, एनएमआरडीए, पीएमआरडीए, पीसीएनडीटी इ. संस्थामध्ये नियुक्त सफाई कामगार आणि सदर संस्थांनी खाजगी कंत्राटदाराकडील तसेच बाह्यस्त्रोत कंत्राटाद्वारे त्यांच्या कामासाठी नियुक्त केलेले सफाई कामगार | संबधित संस्थांचे प्रशासकीय प्रमुख/ व्यवस्थापकीय संचालक/ मुख्य कार्यकारी अधिकारी/ महानगर आयुक्त (संबंधित संस्थेच्या निधीतून ) |
| ६ | राज्य शासनाचे अंगीकृत उपक्रम/ महामंडळे | नियमित/कंत्राटी/ रोजंदारी/ बाह्यस्त्रोता-द्वारे नियुक्त राज्य शासनाचे अंगीकृत उपक्रम/ महामंडळाचे सफाई कामगार आणि राज्य शासनाचे अंगीकृत उपक्रम/ महामंडळे यांनी खाजगी कंत्राटदाराकडील तसेच बाह्यस्त्रोत कंत्राटाद्वारे त्यांच्या कामासाठी नियुक्त केलेले सफाई कामगार | संबधित संस्थांचे प्रशासकीय प्रमुख/ व्यवस्थापकीय संचालक/मुख्य कार्यकारी अधिकारी (संबंधित उपक्रमे / महामंडळे यांचे निधीतून ) |
| ७ | राज्य शासनामार्फत अनुदान/ कर्ज मिळत असलेले साखर कारखाने/ सूतगिरण्या/ सहकारी संस्था | राज्य शासनामार्फत अनुदान/ कर्ज मिळत असलेले साखर कारखाने/ सूतगिरण्या/ सहकारी संस्थांकडील नियमित/कंत्राटी/ रोजंदारी/ बाह्यस्त्रोताद्वारे नियुक्त सफाई कामगार तसेच सदर साखर कारखाने/ सूतगिरण्या/ सहकारी संस्थांनी खाजगी कंत्राटदाराकडील तसेच बाह्यस्त्रोत कंत्राटाद्वारे त्यांच्या कामासाठी नियुक्त केलेले सफाई कामगार | संबधित साखर कारखाने/ सूतगिरण्या/ सहकारी संस्था यांचे व्यवस्थापकीय संचालक/ सचिव (संबंधीत संस्थेच्या निधीतून ) |
| ८ | महाराष्ट्र राज्यातील कटक मंडळे | नियमित/कंत्राटी/ रोजंदारी/ बाह्यस्त्रोता-द्वारे नियुक्त महाराष्ट्र राज्यातील कटक मंडळाचे सफाई कामगार आणि सदर कटक मंडळे यांनी खाजगी कंत्राटदाराकडील तसेच बाह्यस्त्रोत कंत्राटाद्वारे त्यांच्या कामासाठी नियुक्त केलेले सफाई कामगार | संबंधित कटक मंडळाचे प्रशासकीय प्रमुख (संबंधित कटक मंडळाच्या निधीतून) |

| | | | |
|---|---|---|---|
| ९ | महाराष्ट्र राज्यातील रेल्वे परिक्षेत्र | नियमित/कंत्राटी/ रोजंदारी/ बाह्यस्रोताद्वारे नियुक्त महाराष्ट्र राज्यातील रेल्वे परिक्षेत्रातील संबंधित रेल्वे यंत्रणेकडून नियुक्त सफाई कामगार आणि महाराष्ट्र राज्यातील संबंधित रेल्वे यंत्रणा यांनी खाजगी कंत्राटदाराकडील तसेच बाह्यस्त्रोत कंत्राटाद्वारे त्यांच्या कामासाठी नियुक्त केलेले सफाई कामगार | मुख्य प्रबंधक,रेल्वे (संबंधीत रेल्वेच्या निधीतून) |
| १० | केंद्र शासनाचे कार्यालय/ आस्थापना | नियमित/कंत्राटी/रोजंदारी/बाह्यस्त्रोताद्वारे नियुक्त केंद्र शासनाचे कार्यालय/ आस्थापना येथील सफाई कामगार आणि सदर कार्यालय/ आस्थापना यांनी खाजगी कंत्राटदाराकडील तसेच बाह्यस्त्रोत कंत्राटाद्वारे त्यांच्या कामासाठी नियुक्त केलेले सफाई कामगार | कार्यालय/ आस्थापना प्रमुख (कार्यालयीन / आस्थापना खर्चातून किंवा संबंधीत कार्यालये/ आस्थापना यांच्या निधीतून) |
| ११ | उपरोक्त अ.क्र. १ ते १० मध्ये नमूद कार्यालये/ आस्थापना/ संस्था व्यतिरिक्त उर्वरीत खाजगी क्षेत्र/ खाजगी जागा मालक (एक/अनेक), खाजगी संस्था/ सोसायटी तसेच इतर क्षेत्रामध्ये घडलेल्या घटना. | उपरोक्त अ.क्र. १ ते १० मध्ये नमूद कार्यालये/ आस्थापना/ संस्था व्यतिरिक्त उर्वरीत खाजगी क्षेत्र/ खाजगी जागा मालक (एक/अनेक), खाजगी संस्था/ सोसायटी तसेच इतर क्षेत्रामध्ये नियमित/कंत्राटी/ रोजंदारी/ बाह्यस्त्रोताद्वारे नियुक्त सफाई कामगार आणि सदर खाजगी क्षेत्र/ खाजगी जागा मालक, खाजगी संस्था/ सोसायटी यांनी तसेच इतर क्षेत्रांच्या ठिकाणी संबंधितांनी बाह्यस्त्रोताद्वारे तथा कंत्राटाद्वारे त्यांच्या कामासाठी नियुक्त केलेले सफाई कामगार | उपरोक्त अ.क्र. १ ते १० मध्ये नमूद कार्यालये/ आस्थापना/ संस्था व्यतिरिक्त उर्वरीत खाजगी क्षेत्राच्या ठिकाणी ज्यांनी नियुक्ती केली आहे ती व्यक्ती / संस्था संबंधित खाजगी जागा मालक (एक/अनेक)/ संबंधित खाजगी संस्था/ संबंधित सोसायटी तसेच इतर क्षेत्रामध्ये संबंधित व्यक्ती /संस्था यांच्या निधीतून |

३. मा. सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशानुसार दूषित गटारामध्ये काम करतांना मृत्यु पावलेल्या कामगारावर अवलंबून असणाऱ्या कुटूंबातील सदस्यांना तसेच कामाच्या दरम्यान आलेल्या अपंगत्वाच्या गंभीरतेनुसार संबंधित सफाई कामगारास / मॅन्यूअल स्कॅव्हेंजर्सना कायमच्या अपंगत्वासाठी मा.सर्वोच्च न्यायालयाच्या दिनांक २०.१०.२०२३ च्या आदेशास अनुसरुन विहित केल्याप्रमाणे नुकसान भरपाई देण्याची सर्वस्वी जबाबदारी वरीलप्रमाणे निश्चित करण्यात आलेल्या सक्षम प्राधिकारी (जबाबदार अधिकारी) यांची राहील.

४. प्रस्तुत प्रकरणी नुकसान भरपाई अदा करण्याच्या अनुषंगाने आवश्यक तो निधी वेळेवर उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी वरील सक्षम प्राधिकारी यांची राहील.

५. उपरोक्त अ.क्र. १ ते १० मध्ये नमूद कार्यालये/ आस्थापना/ संस्था व्यतिरिक्त उर्वरीत खाजगी क्षेत्राच्या ठिकाणी ज्यांनी नियुक्ती केली आहे ती व्यक्ती / संस्था संबंधित खाजगी जागा मालक/ संबंधित खाजगी संस्था/ संबंधित सोसायटी तसेच इतर क्षेत्रामध्ये संबंधित व्यक्ती /संस्था यांचेकडून त्यांच्या निधीतून निर्धारित नुकसान भरपाई संबंधितांना वेळेवर अदा होईल याची दक्षता संबंधित जिल्हाधिकारी यांनी घ्यावी. घटनेचे गांभीर्य लक्षात घेता व नुकसान भरपाई तातडीने मिळावी या हेतूने सदर खाजगी जागा मालक, संस्था किंवा सोसायटी यांच्यावर मालमत्ता कर बोजा चढवून सदर नुकसान भरपाई तातडीने अदा करण्याबाबत जिल्हाधिकारी सक्षम राहतील.

६. सदर प्रकरणी दूषित गटारामध्ये मृत्यु पावलेल्या सफाई कामगारावर / मॅन्यूअल स्कॅव्हेंजर्सवर अवलंबून असणाऱ्या कुटुंबास तसेच कामाच्या दरम्यान आलेल्या अपंगत्वाच्या गंभीरतेनुसार कायम अपंगत्व व अपंगत्व आलेल्या संबंधित सफाई कामगारास / मॅन्यूअल स्कॅव्हेंजर्स यांना यापूर्वी इतर देय स्वरूपात (उदा. Workman Compensation Act व इतर अनुषंगिक स्वरूपात किंवा अन्य कोणत्याही कायदा/ नियम/ योजनेखाली मिळालेली) नुकसान भरपाई दिलेली असली तरी मा. सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशानुसार विहित केलेली नुकसान भरपाई स्वतंत्रपणे देणे बंधनकारक राहील. याचाच अर्थ उक्त नुकसान भरपाई देय इतर लाभाव्यतिरीक्त/ इतर नुकसान भरपाई व्यतिरिक्त असेल.

७. हाताने मैला उचलणाऱ्या सफाई कामगारांच्या नियुक्तीस प्रतिबंध करणे व त्यांचे पुनर्वसन अधिनियम, २०१३ च्या अंमलबजावणीसाठी दिनांक ३१.०७.२०१९ च्या अधिसूचनेन्वये जिल्हा स्तर व उपविभागीय स्तरावर दक्षता समित्या गठीत करण्यात आलेल्या आहेत. या दक्षता समित्यांनी नियमितपणे बैठका घेऊन त्यांच्या कार्यक्षेत्रातील दूषित गटारांमध्ये काम करतांना मृत्यु पावलेल्या / कायम अपंगत्व / अपंगत्व आलेल्या सफाई कामगारांच्या /मॅन्युअल स्कॅव्हेंजर्सच्या प्रकरणांच्या नुकसान भरपाईचा आढावा घेऊन संबंधितांना तात्काळ नुकसान भरपाई मिळेल याची दक्षता घेणे तसेच, यासंदर्भात केलेल्या कार्यवाहीचा अहवाल वेळोवेळी आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांचेमार्फत सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई तथा संबंधित विभागास पाठविणे आवश्यक राहील.

८. प्रस्तुत प्रकरणी सर्व संबंधितांनी मा.सर्वोच्च न्यायालयाने दिलेल्या उपरोक्त आदेशास अनुसरूनच नुकसान भरपाई अदा करण्याची कार्यवाही करणे आवश्यक राहील.

९. प्रस्तुत प्रकरणी मा.सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशाचे काटेकोरपणे पालन करण्याची दक्षता सर्व संबंधितांनी घ्यावी.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२५०४३०१६०१०५१२२२ असा आहे. हा शासन निर्णय डीजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HARSHADEEP SHRIRAM KAMBLE

Digitally signed by HARSHADEEP SHRIRAM KAMBLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=abe9338c4cb37835a2aa15008d7fc329c11b1640556aa5d5698bffb566d33473, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=995C99CB25735CCC93503D0DC5680E54902C3A705DFDCDAF9A8A4463856F5154, cn=HARSHADEEP SHRIRAM KAMBLE
Date: 2025.04.30 16:02:01 +05'30'

**( डॉ.हर्षदीप कांबळे )**
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव,महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२) मा.मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई,
३) मा.मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा.राज्य मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५) मा. विरोधी पक्षनेता, विधान सभा/ विधान परिषद, विधान मंडळ, मुंबई,
६) सर्व सन्माननीय सदस्य, विधान सभा/ विधान परिषद,
७) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
८) सर्व अ.मु.स./ प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई,
९) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१०) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखापरिक्षा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
११) सर्व विभागीय आयुक्त, महाराष्ट्र राज्य,
१२) मुख्याधिकारी/मुख्य कार्यकारी अधिकारी, म्हाडा,सिडको, एमएमआरडीए, एनएमआरडीए, पीएमआरडीए, पीसीएनडीटी,
१३) सर्व जिल्हाधिकारी,
१४) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, महाराष्ट्र राज्य,
१५) सर्व मुख्याधिकारी, नगर परिषद/ नगरपालिका/नगरपंचायत, महाराष्ट्र राज्य,
१६) सर्व प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण,
१७) सर्व सहाय्यक आयुक्त,समाजकल्याण,
१८) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१९) प्रशासकीय प्रमुख, कटकमंडळे, महाराष्ट्र राज्य,
२०) मुख्य प्रबंधक,रेल्वे, महाराष्ट्र राज्य,
२१) केंद्र शासनाची महाराष्ट्र राज्यातील सर्व कार्यालये,
२२) राज्य शासनाची सर्व कार्यालये,
२३) सर्व साखर कारखाने, सुतगिरण्या, सहकारी संस्था यांचे अध्यक्ष/सचिव, महाराष्ट्र राज्य,
२४) राज्य शासनाचे अंगीकृत उपक्रम/ महामंडळे या संस्थांचे प्रशासकीय प्रमुख/ व्यवस्थापकीय संचालक/मुख्य कार्यकारी अधिकारी/ महानगर आयुक्त, महाराष्ट्र राज्य,
२५) निवडनस्ती (सआक).